वनविभागाचे संगणकीकरण या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता निधी वितरित करणेबाबत. (२४०६ ८६६९)

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२३/प्र.क्र.१००/फ-१०**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक :- ११ जून, २०२५**

वाचा :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०७.०४.२०२५

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१ / पी / यो / चाबाप्र / प्र.क्र.१६/४७/२०२५-२६, दि.१७.०४.२०२५.

**प्रस्तावना :-**

सन २०२५-२६ करिता वनविभागाचे संगणकीकरण-२४०६ ८६६९ या योजनेंतर्गत १०-कंत्राटी सेवा अंतर्गत रू.१५७४.९९ लक्ष, १३-कार्यालयीन खर्च- ०.०१ लक्ष, २८-व्यावसायिक सेवा अंतर्गत रु.४२०.०० लक्ष व ५०-इतर खर्च अंतर्गत रु.१०५.०० लक्ष असे एकूण रू.२१००.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित केलेला आहे.

वित्त विभागाने संदर्भीय क्र.१ येथील दिनांक ०७.०४.२०२५ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२५-२६ च्या प्रथम नऊमाहीकरीता (डिसेंबर, २०२५ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत केला जाईल, असे नमूद केले आहे. त्यानुसार वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर १०-कंत्राटी सेवा मध्ये रु. ३७७.९९६० लक्ष व २८ - व्यावसायिक सेवा मध्ये रु.७१.४० लक्ष निधी वितरीत केला आहे.

तसेच, ५०-इतर खर्च या उद्दिष्टाकरीता निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनासह आवश्यकतेनुसार नियोजन विभाग / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत तसेच विभागाच्या अर्थसंकल्प शाखेमार्फत वित्त विभागाकडे सादर करावेत, असे नमूद केले आहे.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भीय क्र. २ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार व अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि

सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध निधीच्या मर्यादेत वित्त विभागाने सहमती दर्शविल्यानुसार निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वाचा येथील क्र.२ अन्वये सादर केलेला प्रस्ताव, वित्त विभागाचे वाचा येथील क्र.१ चे परिपत्रक व बिम्स प्रणालीवरील निधीची उपलब्धता विचारात घेता, वनविभागाचे संगणकीकरण करणे या योजनेंतर्गत खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार रु. ४४९.३९७६० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**(आकडे रु. लाखात)**

| लेखाशिर्ष | उद्दिष्ट | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|
| मागणी क्रमांक :- सी-७,<br>२४०६, वनीकरण व वन्यजीवन,<br>१०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना,<br>(१७) वन विभागाचे संगणकीकरण,<br>(१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण,<br>संकेतांक-२४०६ ८६६९ | १० - कंत्राटी सेवा | ३७७.९९७६० |
| | २८- व्यावसायिक सेवा | ७१.४० |
| | **एकूण** | **४४९.३९७६०** |

२. उपरोक्त निधी खर्च करताना पुढील अटींची पूर्तता होईल, याची खात्री करण्यात यावी:-

i) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी मंजूर कामांसाठीच खर्च होईल व कामाची द्विरुक्ती होणार नाही याची खात्री करावी. तसेच मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर / नवीन क्षेत्रावर / नवीन कामांवर खर्च करता येणार नाही.

ii) सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

iii) सदर योजनेकरीता वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

iv) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी वित्त विभागाच्या दिनांक ०७.०४.२०२५ रोजीचे परिपत्रकात्रातील अटी व

शर्तींची पूर्तता होत असल्याची खात्री करावी. तसेच त्यासोबतच्या परिशिष्टामधील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

v) वन विभागाचे संगणकीकरण करणे या योजनांकरीता वेळोवेळी निर्गमित केलेल्या धोरणात्मक शासन निर्णयांमधील अटी व शर्तींची पूर्तता करावी.

vi) वितरीत करून घेतलेला निधी मंडळे / महामंडळे यांच्या वा इतर बँक खात्यात, स्वयप्रपंची लेख्यामध्ये अथवा सार्वजनिक बांधकाम विभागाकडील ठेव अंशदान निधीमध्ये काढून ठेवता येणार नाही.

३. उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७ २४०६ - वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, राज्य योजनांतर्गत योजना, (१७) वन विभागाचे संगणकीकरण, (१७) (०१) वन विभागाचे संगणकीकरण, (२४०६ ८६६९), या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दिनांक ०७.०४.२०२५ रोजीचे परिपत्रकान्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६१११६४५४८५५१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

GANESH TUKARAM JADHAO

Digitally signed by GANESH TUKARAM JADHAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0078f58512d3ac01315bbbfa4b473ed7729dd2d31644106e2966ab9ee6e92d7d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FEEDE606678D569A76B842319BD1C2969AA85BBA5CDCCEE147249F17965E8BB, cn=GANESH TUKARAM JADHAO
Date: 2025.06.11 16:46:41 +05'30'

**(गणेश जाधव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (माहिती, तंत्रज्ञान व धोरण), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), ½, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
५) संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२
६) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-६) / (व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
७) उप सचिव, नियोजन विभाग (१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
८) कार्यासन (ब-१ / फ-२), महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
९) निवडनस्ती.